जल जीवन मिशन अंतर्गत ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या तांत्रिक/ प्रशासकीय/ अंमलबजावणी अधिकारांबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जजमि- २०२० /प्र.क्र. १३८ /पापु १०**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
क्रॅाफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख: २२ सप्टेंबर, २०२१

वाचा-

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.जजमि २०२०/प्र.क्र.१३८/ पापु १० (०७), दि.०४.०९.२०२०
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.जजमि २०२०/प्र.क्र.१३८/ पापु १० (०७), दि.१०.०३. २०२१
३) केंद्र शासनाच्या National Jal Jeevan Mission यांचे पत्र दि.W- ११०११/२०/२०२१-JJM-DDWS दि. १४.०८.२०२१

प्रस्तावना-

जलजीवन मिशनचा सन २०२१-२२ हा आराखडा निश्चित करण्यात आला असून वार्षिक कृती आराखडा २०२१ यामध्ये एकूण २९,८४८ योजना समाविष्ट आहेत. राज्यात एवढ्या मोठ्या प्रमाणावरील योजनांच्या अंमलबजावणीसाठी सर्व अनुषंगिक बाबी पुर्ण करणे म्हणजे त्याला तांत्रिक मान्यता देणे, प्रशासकीय मान्यता देणे, निविदा प्रक्रिया करणे हे अत्यंत गतीने होणे आवश्यक आहे. केंद्र शासनाच्या दिनांक १४ ऑगस्ट २०२१ च्या निर्देशानुसार दिनांक ३१ डिसेंबर २०२१ पूर्वी सर्व प्रादेशिक पाणीपुरवठा योजनांचे कार्यादेश देण्यापर्यंतची प्रक्रिया पूर्ण करणे आवश्यक आहे. सबब एवढ्या प्रचंड मोठ्या प्रमाणावर विविध योजनांच्या तांत्रिक मान्यतेचे सुसुत्रीकरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय-

१) शासन निर्णय दिनांक १०.०३.२०२१ मध्ये परिच्छेद क्र. (Vii) नुसार रु.३०.०० कोटी पेक्षा अधिक किंमतीच्या योजनांची छाननी करण्यासाठी अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्या अध्यक्षतेखाली राज्य पाणी व स्वच्छता मिशनची तांत्रिक छाननीसाठी समिती

गठीत करण्यात आली आहे. तथापि केंद्र शासनाच्या जल जीवन मिशन विषयक मार्गदर्शक सूचनांनुसार (राज्यस्तरीय योजना मंजुरी समिती) State level Scheme Sanctioning Committee (SLSSC) गठीत करण्यात आलेली आहे. यामध्ये केंद्र शासनाचे विविध प्रतिनिधी असून सदर समिती ही अपर मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली असून योजनांच्या तांत्रिक बाबींवर संपूर्ण विचार करते. सबब द्विरूक्ती टाळण्यासाठी शासन निर्णय दिनांक १०.०३.२०२१ परिच्छेद क्र. (Vii) मधील अपर मुख्य सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांच्या स्तरावरील समिती पूर्णतः रद्द करण्यात येत आहे. या ऐवजी राज्यस्तरीय योजना मंजुरी समिती (SLSSC) योजनांना मान्यता देईल.

२) शासन निर्णय दि.१०.०३.२०२१ च्या परिच्छेद क्र. (VI) मध्ये रु.५.०० कोटी ते रु.३०.०० कोटी पर्यंतच्या योजनांची छाननी करण्यासाठी मिशन संचालक, जल जीवन मिशन यांच्या अध्यक्षतेखाली राज्य पाणी व स्वच्छता मिशनची उप समिती आहे. तथापि सदस्य सचिव (महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ) यांच्याकडे सर्व तांत्रिक यंत्रणा उपलब्ध आहेत. या तांत्रिक बाबीचा विचार करता मिशन संचालक यांच्या अध्यक्षतेखालील समिती ऐवजी ही समिती आता सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे असेल. ही समिती रु. ५.०० कोटी वरील सर्व योजनांची तांत्रिक छाननी करेल.

१) अध्यक्ष - सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई.
२) सदस्य - मिशन संचालक (जल जीवन मिशन ), राज्य पाणी व स्वच्छता मिशन
३) सदस्य -मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
४) सदस्य - प्रकल्प संचालक (वित्त), जल जीवन मिशन,राज्य पाणी व स्वच्छता मिशन
५) सदस्य - कार्यकारी अभियंता, राज्य पाणी व स्वच्छता मिशन
६) सदस्य - उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (संबंधित प्रादेशिक विभाग
७) सदस्य सचिव – अधिक्षक अभियंता (मुख्यालय), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९२२१४५९३१८६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Kundlik Puri

Digitally signed by Pravin Kundlik Puri
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=deec47ad25fc7d88d8920ac82eeb80566d6602e538e92d0aa7206eb36e7aa29c, cn=Pravin Kundlik Puri
Date: 2021.09.22 18:13:29 +05'30'

**(प्रवीण पुरी)**
सह सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, विधीमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, विधीमंडळ सचिवालय, मुंबई
८. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई
९. मा.अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. मा.अपर मुख्य सचिव पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे वरिष्ठ स्वीय्य सहायक, मंत्रालय, मुंबई.
११. मिशन संचालक, जल जीवन मिशन (राज्य पाणी व स्वच्छता मिशन), बेलापूर, नवी मुंबई.
१२. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
१३. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१५. उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी (सर्व), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. मुख्य अभियंता/ अधिक्षक अभियंता/ कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)

१७.प्रकल्प संचालक, जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन, जिल्हा परिषद (सर्व)
१८.कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
१९.निवडनस्ती -कार्यासन- पापु १०